**माजी राष्ट्रपती स्व.डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाम यांचा दिनांक १५ ऑक्टोबर हा जन्मदिवस “वाचन प्रेरणा दिन” म्हणून साजरा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: वाप्रेदि-२०१८/प्र.क्र.१३३/भाषा-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :** मराठी भाषा विभाग, शासन परिपत्रक क्र.वाप्रेदि - २०१५/प्र.क्र.८९/२०१५/भाषा-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०१५.

**शासन परिपत्रक :-**

माजी राष्ट्रपती स्व.डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाम यांच्या स्मृती जतन करण्याच्या उद्देशाने दिनांक १५ ऑक्टोबर हा त्यांचा जन्मदिवस “वाचन प्रेरणा दिन” म्हणून साजरा करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या निर्णयास अनुसरुन शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांमध्ये वाचनाची प्रेरणा निर्माण करण्यासाठी व वाचनाची आवड वृध्दींगत करण्याच्या दृष्टीने यापूर्वी संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये सूचना देण्यात आल्या होत्या. त्याचप्रमाणे या वर्षी सुध्दा वाचन प्रेरणा दिन साजरा करण्याच्या दृष्टीने सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व शासकीय/निमशासकीय कार्यालये, शासकीय संस्था / मंडळ, सार्वजनिक उपक्रम इ. कार्यालयांनी देखील विविध उपक्रमांचे आयोजन करण्याबाबत पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. दिनांक १५ ऑक्टोबर, शासकीय / निमशासकीय कार्यालये, शाळा यांनी कार्यक्रमाचे आयोजन करावे, प्रत्येक अधिकारी / कर्मचारी तसेच शालेय विद्यार्थी, शिक्षकवर्ग आणि शिक्षकेतर कर्मचारी यांनी कामकाजाच्या वेळेमध्ये किमान अर्धा तास वाचनासाठी द्यावा, वाचनाकरीता समुहाने एकत्रितपणे बसून आपला वेळ वाचनासाठी सलग काही तास “वाचन ध्यास” म्हणून व्यतित करावा.
२. वाचन संस्कृती जोपासण्यासाठी सर्वांनी आपले मित्र, कुटुंबातील सदस्य इत्यादींना किमान एक पुस्तक भेट द्यावे.
३. चालू वर्ष हे ख्यातनाम साहित्यिक पु.ल.देशपांडे, ग.दि.माडगुळकर यांची जन्मशताब्दी तसेच राम गणेश गडकरी यांचे स्मृतीशताब्दी वर्ष आहे. त्या अनुषंगाने या मान्यवर साहित्यिकांच्या साहित्याशी संबंधित समर्पक कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे.
४. विविध क्षेत्रातील सुप्रसिध्द व्यक्ती ज्यांचा वाचक म्हणूनही लौकिक आहे. त्यांचे सहकार्य घेऊन वाचन प्रेरणा किंवा वाचन संस्कृतीशी संबंधित विषयावर व्याख्यान /चर्चासत्र / परिसंवाद / कार्यशाळा यांचे आयोजन करण्यात यावे.
५. लेखकांशी त्यांच्या लेखनाविषय, त्यांच्या कलाकृतींविषयी चर्चा किंवा त्यांच्या प्रकट मुलाखतींचे कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत.

६. भारतातील पहिलं पुस्तकांच गाव (भिलार, ता. महाबळेश्वर, जि. सातारा) या उपक्रमाची माहिती विविध माध्यमांतून विद्यार्थ्यांना देणे किंवा निवडक विद्यार्थ्यांना घेऊन अभ्यास सहलींचे आयोजन करण्यात यावे.

७. संकल्प - महिन्यातील एक दिवस “नो गॅजेट डे” म्हणून कृतीत आणण्याचे आवाहन. (“नो गॅजेट डे” - मोबाईल, व्हॉटस्ॲप ,फेसबुक ,ट्विटर न वापरता तो वेळ वाचनासाठी देणे).

८. पुष्पगुच्छ नव्हे पुस्तक (बुके नव्हे बूक) - सार्वजनिक कार्यक्रमांत पाहुण्यांना पुष्पगुच्छाऐवजी पुस्तक भेट देण्याच्या शासन निर्णयाची अंमलबजावणी व प्रसार.( वाढदिवशी किंवा वाचन प्रेरणा दिनाचे निमित्त साधून परस्परांना पुस्तक भेट देण्याचे आवाहन)

९. शाळा ,महाविद्यालय, ग्रंथालय व इतर संस्थांनी आपल्या परिसरात “डॉ.ए.पी.जे .अब्दुल कलाम वाचन कट्टा” निर्मिती करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००११६२९५८१५३३ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: CN = Aparna Arvind Gawde, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Marathi Language Department
Date: 2018.10.01 16:43:44 +05'30'

(अपर्णा अ. गावडे)

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

<u>प्रत</u> -

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री (मराठी भाषा) यांचे विशेष कार्यकारी अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
४. मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद/विधानसभा) यांचे खाजगी सचिव
६. मा.मुख्य सचिव / सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई (पत्राने),
८. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने),
९. प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१०. सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, विधान भवन, मुंबई,१२.
११. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१२. सर्व मंत्रालयीन विभाग,
१३. सर्व विभागीय आयुक्त,

१४. सर्व जिल्हाधिकारी,
१५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई,
१७. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर,
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२०. भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२१. संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
२२. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
२३. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
२४. निवड नस्ती / भाषा -३.